**कृषि पुरक व्यवसायासाठी कौशल्य विकास प्रशिक्षण कार्यक्रम २०१४-१५ मध्ये राबविण्यासाठी रक्कम रु.१८.४० लाख रकमेच्या कार्यक्रमास वित्तीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण- १४१४/प्र.क्र.१२४/३ अे
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०००३२
तारीख: १२ सप्टेंबर,२०१४

*<u>वाचा -</u>*

**शासन निर्णय क्रमांकः प्रशिक्षण १४१४/प्र.क्र.१२४/३ अे, दिनांक २६.५.२०१४**
**शासन निर्णय क्रमांकः प्रशिक्षण १४१४/प्र.क्र.१२४/३ अे, दिनांक ३०.६.२०१४**

*<u>प्रस्तावना -</u>*

शेतीची पर्यायाने शेतकऱ्यांची उत्पादकता वाढविण्याच्या दृष्टीकोनातून, शेतकऱ्यांना कौशल्य विकास प्रशिक्षण देण्याबाबतचा विदर्भ विकास कार्यक्रम - कृषि पुरक व्यवसायासाठी कौशल्य विकास प्रशिक्षण कार्यक्रम विदर्भातील ११ जिल्हयामध्ये सन २०११-१२ या वर्षात राबविण्यात आला. सन २०१२-१३ या वर्षात सदर कार्यक्रम राज्यातील ३३ जिल्हयात राबविण्यात आला.

२. सदर कार्यक्रम सन २०१४-१५ या वर्षात राबविण्यासाठी रुपये ५० लक्ष एवढी तरतुद करण्यात आली आहे. सदर कार्यक्रम राज्यातील ३३ जिल्हयामध्ये राबवावयाचा आहे. सदर निधीतून राबवावयाच्या कार्यक्रमास संदर्भाधीन अनु.क्र.१ येथील शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. संदर्भाधीन अनु.क्र.२ येथील शासन निर्णयान्वये रुपये ११.६० लक्ष एवढा निधी लेखानुदानान्वये वितरीत करण्यात आला आहे. वित्त विभागाच्या दिनांक १.७.२०१४ च्या परिपत्रकान्वये मंजूर तरतुदीच्या ६० टक्के अनुदान वितरीत करण्याचे सुचित केले आहे. त्यानुसार कृषि पुरक व्यवसायासाठी कौशल्य विकास प्रशिक्षण कार्यक्रमाअंतर्गत अर्थसंकल्पिय तरतुद रुपये ५० लक्ष पैकी ६० टक्केच्या मर्यादेत लेखानुदानान्वये वितरीत तरतुद रुपये ११.६० लक्ष वजा जाता उर्वरित रुपये १८.४० लक्ष एवढा निधी वितरीत करण्याचा प्रस्ताव शासनाचा विचाराधीन होता.

**शासन निर्णय -**

विदर्भ विकास कार्यक्रम - कृषि पुरक व्यवसायासाठी कौशल्य विकास प्रशिक्षण कार्यक्रम सन २०१४-१५ या आर्थिक वर्षात राबविण्यासाठी रक्कम रुपये १८.४० लक्ष एवढया रकमेच्या कार्यक्रमास शासनाची वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

२. या प्रित्यर्थ होणारा खर्च खालील लेखाशिर्षाखाली सन २०१४-१५ मध्ये मंजूर केलेल्या निधीतून भागविण्यात यावा:-

मागणी क्रमांक डी -३
२४०१, पीक सवर्धन,
१०९, विस्तार व प्रशिक्षण
(०१)(४९) कृषि पुरक व्यवसायासाठी कौशल्य विकास प्रशिक्षण
कार्यक्रम राबविणे (राज्य योजना) (२४०१८७४५)
३३, अर्थसहाय्य

३. सदरहू प्रशिक्षण कार्यक्रम डॉ.पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ,अकोला आणि वसंतराव नाईक राज्य कृषि व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था,नागपूर यांच्या मार्फत राबविण्यात यावा. तसेच संबंधित विद्यापीठाकडील कृषि विज्ञान केंद्र,स्वयंसेवी संस्थाकडील प्रशिक्षण केंद्र,कृषि चिकित्सालये, त्याचबरोबर राष्ट्रीयकृत बँकांकडील प्रशिक्षण केंद्र व संलग्न विभागाकडील प्रशिक्षण केंद्रावर कृषि कौशल्य विकास प्रशिक्षण कार्यक्रम सन २०१४-१५ या वर्षात राज्यातील ३३ जिल्हयांमध्ये राबविण्यासही शासन मान्यता देण्यात येत आहे.

४. सन २०१४-१५ मध्ये शेतीपूरक व्यवसायासाठी कौशल्य विकास प्रशिक्षण कार्यक्रमाची अंमलबजावणी करण्यासाठी संचालक (आत्मा ) तथा कृषि नोडल अधिकारी यांना प्राधिकृत करण्यास येत असून त्यांनी या योजनेच्या मार्गदर्शक सूचना निर्गमित कराव्यात.

५. मंजूर केलेला निधी खर्च करण्यास तसेच जिल्हानिहाय निधी वितरण करण्यास संचालक (आत्मा) तथा कृषि नोडल अधिकारी कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. मंजूर बाबीवरील खर्च मासिक कॅश फ्लोच्या मर्यादेत राहील याची दक्षता घेण्याची तसेच संगणकीय अर्थसंकल्पिय प्रणालीद्वारे (BDS) निधी वितरण करण्याची आणि वितरणेनुसार संबंधित जिल्हयांचा बाबनिहाय खर्च एकत्रितरित्या विभाग निहाय प्रत्येक महिन्याच्या १० तारखेच्या पर्यंत न चुकता शासनास सादर करण्याची जबाबदारी संचालक (आत्मा ) तथा कृषि नोडल अधिकारी, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे, यांची राहील.

६. सदर शासन निर्णय नियोजन विभागाने त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक २४३/१४३१,दिनांक ४.९.२०१४ व वित्त विभागाने त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक २९१/२०१४ म,व्य.य.१, दि.१०.९.२०१४ च्या अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार व अपर मुख्य सचिव (कृषि) यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०९१६१२५४१११९०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Borkar Vidyadhar M

Digitally signed by Borkar Vidyadhar M
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Agri & ADF, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Borkar Vidyadhar M
Date: 2014.09.16 12:50:22 +05'30'

**(वि.म.बोरकर)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मंत्री(कृषि) यांचे खाजगी सचिव
२. मा.राज्यमंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव
३. सर्व मा. विधानसभा/परिषद सदस्य
४. सचिव,(पदुम),कृषि,पशुसंवर्धन,दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,मंत्रालय,मुंबई
५. सचिव(मृद व जलसंधारण),ग्राम विकास विभाग,मंत्रालय,मुंबई
६. सचिव,ग्राम विकास विभाग,मंत्रालय,मुंबई

७. सर्व विभागीय आयुक्त
८. कुलगुरु, सर्व कृषि विद्यापीठे
९. आयुक्त,कृषि,महाराष्ट्र राज्य,पुणे (५ जादा प्रतीसह)
१०. आयुक्त,सहकार व निबंधक,सहकारी संस्था,महाराष्ट्र राज्य,पुणे
११. आयुक्त,पशुसंवर्धन,महाराष्ट्र राज्य,पुणे
१२. आयुक्त,मत्स्यव्यवसाय,महाराष्ट्र राज्य,पुणे
१३. आयुक्त,दुग्धव्यवसाय,वरळी,मुंबई,महाराष्ट्र राज्य
१४. साखर आयुक्त,महाराष्ट्र राज्य,पुणे
१५. सर्व जिल्हाधिकारी
१६. सर्व जिल्हयांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,जिल्हा परिषद
१७. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१८. संचालक (आत्मा),तथा नोडल अधिकारी,कृषि आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य,पुणे (५ जादा प्रतीसह)
१९. सर्व संचालक / कृषि सहसंचालक,कृषि आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य,पुणे
२०. सर्व विभागीय कृषि सहसंचालक
२१. संचालक,पणन संचालनालय,मध्यवर्ती इमारत,शिवाजी नगर,महाराष्ट्र राज्य,पुणे
२२. संचालक,(समाजकल्याण),महाराष्ट्र राज्य,पुणे
२३. संचालक,रेशीम उदयोग,पुणे-मुंबई रस्ता,शासकीय दूध डेअरीसमोर,पुणे ४११००३
२४. संचालक,प्रधान मुख्य वन संरक्षक व महासंचालक,सामाजिक वनीकरण, मध्यवर्ती इमारत,महाराष्ट्र राज्य,पुणे
२५. संचालक,वसंतराव नाईक राज्य कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था,नागपूर
२६. प्राचार्य, विभागीय कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था,खोपोली,ता.खानापूर,जि.रायगड.
२७. प्राचार्य, विभागीय कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था,गेट क्रमांक ४,शहाजी नगर,लाईन बजार,कोल्हापूर,
२८. प्राचार्य, विभागीय कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था,बुलडोजर युनिट,शिवाजी नगर,पोस्ट ऑफीस जवळ, च-होली , पुणे.
२९. प्राचार्य, विभागीय कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था,संभाजी चौक, उंटवाडी रोड, नाशिक
३०. प्राचार्य, विभागीय कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था,.शहानुर मिया, दर्गा रोड, औरंगाबाद.
३१. प्राचार्य, विभागीय कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था,तपोवन रोड, अमरावती,
३२. प्राचार्य, विभागीय कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था,बंगला क्रमांक ६२/१, धरमपेठ, व्ही.आय.पी.रोड, सीव्हील लाईन, नागपूर.
३३. सर्व जिल्हयांचे जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी
३४. महालेखापाल,महाराष्ट्र-१ (लेखा परीक्षा/ लेखा अनुज्ञेयता),मुंबई
३५. महालेखापाल,महाराष्ट्र-२,(लेखा परीक्षा/लेखा अनुज्ञेयता ),नागपूर
३६. माहिती व जनसंपर्क संचालनालय (५ प्रतीसह)
३७. नियोजन विभाग / वित्त विभाग,मंत्रालय,मुंबई
३८. सर्व सहसचिव /उप सचिव (कृषि),कृषि व पदुम विभाग,मंत्रालय,मुंबई
३९. निवड नस्ती (का.३ अे)